नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१९(७)/का-१४११,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १४ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२,
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी “महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” व “नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुन:स्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिकानगरपंचायत/नगरपरिषद/)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार वसमत नगरपालिका अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. ४.०० कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा वसमत नगरपालिका राहतील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, हिंगोली यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते

क्रमांक) नियोजन विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, हिंगोली / वसमत नगरपालिका यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.ओ-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन,(०१)(०२), नागरी स्थानिक संस्थांना (नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत) सहायक अनुदान (३६०४ १०१८) (कार्यक्रम), ३१,सहायक अनुदान" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४२१४१४४१३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA
DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.14 21:50:39 +05'30'

**( चारूशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, छ. संभाजीनगर विभाग,
२. जिल्हाधिकारी, हिंगोली,
३. मुख्य अधिकारी, वसमत नगरपालिका , जि. हिंगोली,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, हिंगोली,
५. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली,
९. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१९(०७)/का-१४११, दि.१४ मार्च ,२०२४ सोबतचे परिशिष्ट, वसमत नगरपरिषद, रु४..०० कोटी | | |
|---|---|---|
| अ.क्र. | कामांचे नांव | रक्कम (लाख.रु) |
| १. | प्रभाग क्र. १२ मध्ये दत्त डेव्हलपर्स अंतर्गत सी. सी. रोड करणे | ४०.०० |
| २. | प्रभाग क्र .१२ मध्ये मोंढा मारुती मंदिर ते बागर हॉस्पिटल ते मुटकुळे यांच्या घरापर्यंत सीसी बांधकाम कर.णे | ४०.०० |
| ३. | प्रभाग क्र मध्ये १२.वडरवाडा येथे आर .सीरोड बांधकाम करणे .सी .नाली व सी . | २५.०० |
| ४. | प्रभाग क्र.१३ मध्ये कारखाना रोड जानी भाई यांचे घर ते राठोड यांचे घर सी.सी. रस्ता करणे | २०.०० |
| ५. | प्रभाग क्र.८ मध्ये बैंक कॉलनी मध्ये अंतर्गत रस्ता व नाली बांधकाम करणे | ५०.०० |
| ६. | प्रभाग क्र.१ मध्ये शुक्रवार पेठ मध्ये इदगाह कब्रस्तान माध्ये नाला बांधकाम करणे, इदगाह कब्रस्तान संरक्षण भिंत बांधकाम करणे, इदगाह कब्रस्तान येथे शेड व बेडचे बांधकाम करणे, माठा तलाव हरजरत चिमणशहा वल्ली रस्ता बांधकाम करणे | ५०.०० |
| ७. | प्रभाग क्र.१३मध्ये कारखाना रोड मयुर मंगल कार्यालस मुस्कान फंक्शन हॉलच्या पाठीमागे कॉलनीत अंतर्गत रस्ता व नाली बांधकाम करणे | ३०.०० |
| ८. | प्रभाग क्र.१४ पाटील नगर मध्ये आनंदनगर मधील ओपन स्पेस मध्ये रनिंग ट्रॅक करणे व गार्डन करणे | ३०.०० |
| ९. | प्रभाग क्र.११ हौ.सो. मध्ये पेव्हर ब्लॉक करणे, कात्नेश्वर कॉम्पलेक्स ते नंदु मुदंडा यांचे घर | १०.०० |
| १०. | प्रभाग क्ररफिक किराणा दुकान खमर बेग ऊर्दू स्कुल रस्ता करणे २ . | १०.०० |
| ११. | प्रभाग क्र. १२ मध्ये बालाजी नगर, गणेश नगर, अशोक नगर अंतर्गत सी.सी. रस्ता नाली बांधकाम व पेव्हर ब्लॉक करणे | ३०.०० |
| १२. | प्रभाग क्र. १२ बहीर्जी नगर येथे भुजबळ यांचे घर ते सुर्यवंशी यांचे घर सी. सी. रस्ता करणे व नाली बांधकाम करणे | २०.०० |
| १३. | प्रभाग क्रमध्ये मैनु शेठ यांचे घर ते कॅनॉल पर्यंत रस्ता व नाली बांधकाम करणे १३ . | १०.०० |
| १४. | प्रभाग क्रदलीत वस्ती महु नगर येथे भिमराव सरकटे ते ४. सिध्दार्थ हिंगोले यांच्या घरापर्यंत नारायण धबडगे ते अशोक शेंडेराव यांचे रस्ते सीरस्ता व नाली .सी. | २०.०० |
| १५. | प्रभाग क्रदलित व ६.स्ती संतोष नागरे यांचे घर ते होमगार्ड कॉलनी पर्यंत सी रस्ता .सी. व नाली बांधकाम नाली करणे | १५.०० |
| | एकुण | ४००.०० |